महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीचे कार्यक्रम राबविण्यासाठी सन २०१०-११ या वर्षाकरिता रू.२० लाख (रूपये वीस लाख फक्त) इतका निधी उपलब्ध करून देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांक:उसाअ-२०१०/प्र.क्र.२७/का.६
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २५ फेब्रुवारी, २०११.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यामध्ये उर्दू भाषेची वाङ्मयीन प्रगती व्हावी तसेच उर्दू व मराठी लेखक व कवी यांच्यात वैचारिक देवाण घेवाण होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी या व अन्य उद्देशाने महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीची स्थापना शासनाने सन १९७५ मध्ये केलेली आहे. या अकादमीमार्फत उर्दू भाषेचे ज्ञान नसणाऱ्या लोकांना उर्दू भाषा वर्ग सुरू करणे, उर्दू साहित्य त्रैमासिकाचे प्रकाशन करणे, उर्दू शाळा व महाविद्यालयांना साहित्याकरिता अनुदान व सहायक अनुदान मंजूर करणे, उर्दू पुस्तकांसाठी पारितोषिके वितरीत करणे या व अशा अनेक योजना राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत राबविण्यात येत आहेत. अकादमीच्या सदर योजनांसाठी अकादमीस निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत सध्या अस्तित्वात असणाऱ्या योजना अधिक प्रभावीपणे राबविण्यासाठी सन २०१०-११ या वर्षाकरिता रू.२०,००,०००/- (अक्षरी रूपये वीस लाख फक्त) इतका मंजूर निधी महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या स्वीय प्रपंजी लेख्यात (PLA Account) जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम खाली नमूद केलेल्या योजनांवर या अकादमीमार्फत खर्च करण्यात यावी.

| योजना | खर्च रुपये |
|---|---|
| १. उर्दू वर्ग :- उर्दू भाषेचे ज्ञान नसणाऱ्यांना उर्दू वर्ग सुरू करणे :- २०,००० × १० = | २,००,०००/- |
| २. राष्ट्रीय चर्चा सत्र :- रु.१,००,००० × २ =<br>राज्य स्तरीय चर्चा सत्र :- रु.२०,००० × १० =<br>राज्य स्तरीय कवि संम्मेलन :- रु. ५०,००० × २ =<br>उर्दू मेहफिल :- रु. १०,००० × २० = | २,००,०००/-<br>२,००,०००/-<br>१,००,०००/-<br>२,००,०००/- |
| ३. उर्दू शाळा, महाविदयालये व विद्यापिठांना वाङमयीन कार्यक्रम आयोजनासाठी सहाय्यक अनुदान रुपये :- ५,००० × २० = | १,००,०००/- |
| ४. उर्दू ग्रंथालयांना मासिके व पुस्तके देणे, राज्यात उर्दू ग्रंथालये व वाचनालय स्थापित करणे. | २,००,०००/- |
| ५. उर्दू नाटय, एकांकिका स्पर्धा, तीन अंकी नाटक व कार्यशाळा,उर्दू नाटयमहोत्सव आयोजित करणे. | २,००,०००/- |
| ६. उर्दू हस्तलिखितांना प्रकाशन अनुदान मराठी -उर्दू / उर्दू -मराठी अनुवादकांना प्रकाशन अनुदान. | २,००,०००/- |
| ७. उर्दू लेखक, कवि इत्यांदीना साहित्यिक सेवा व पुस्तकांवर पारितोषिक देणे. | ३,५०,०००/- |
| ८. आजारी अवस्थेत उर्दू लेखक व कवि यांना सहाय्यक अनुदान देणे. | ५०,०००/- |
| **एकुण खर्च रुपये वीस लाख फक्त** | **२०,००,०००/-** |

कृ.मा.प.

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीसाठी वरील योजनांकरिता होणारा खर्च मागणी क्र.झेडई-१ २२०५ कला व सांस्कृती, १०२-कला व संस्कृती प्रचालन, (००) (०१) उर्दू अकादमीची आस्थापना (२२०५-३०२-७) योजनेतर/दत्तमत, ३१-सहायक अनुदान या लेखाशीर्षाखाली सन २०१०-११ या वर्षामधील मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचे संकेतस्थळ www.maharashtra.gov.in वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०२२८१५०१२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(उ.सं.दांडेकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
सर्व सदस्य, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई (अकादमीच्या कार्यालयामार्फत)
उप सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
वित्त विभाग (अर्थसंकल्प-१४), (व्यय-४), (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा व परिक्षा), नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
कार्यासन-७ अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.
निवड नस्ती (का.६)